# रोकडरहितसाठी 'भीम' एप्लिकेशन लाँच

०१. स्मार्टफोन किंवा अगदी साधा फोन असणारा मोबाइल आणि अंगठ्याचा ठसा एवढीच आवश्यकता असणारे 'भीम' नावाच्या आधार क्रमांकावर आधारलेल्या पेमेंट ॲपचे पंतप्रधान यांनी शुक्रवारी उद्घाटन केले.

०२. 'भारत इंटरफेस फॉर मनी' असे या ॲपचे खरे नाव आहे. सुमारे दोन आठवड्यांत हे ॲप पूर्णपणे कार्यान्वित होणार आहे.

०३. डिजिटल पेमेंट करणाऱ्या भाग्यवान ग्राहकांना एक हजार रुपयांचे बक्षीस देण्याची घोषणा या वेळी मोदींनी केली. त्यानुसार, दररोज पंधरा हजार भाग्यवान ग्राहक निवडले जातील आणि त्यांच्या खात्यावर एक हजार रुपये 'डिजिटली' भरले जातील. तब्बल शंभर दिवस ही योजना चालू राहील आणि १४ एप्रिल रोजी 'महाभव्य लकी ड्रॉ' काढला जाईल.




०४. सध्या फक्त हे एप्लिकेशन अँड्रॉइडवर उपलब्ध आहे. युनिफाइड पेमेंट इंटरफेस (यूपीआय)च्या माध्यमातून पैशांची देवाणघेवाण. कोणताही प्रक्रिया कर नाही. मात्र वापरकर्त्यांची बँक व्यवहारांवरील कर लावू शकते.

०५. तूर्तास ॲपवरून ३० बँकांचे व्यवहार होऊ शकतात. एसबीआय, एचडीएफसी, आयसीआयसीआय, युनियन बँक ऑफ इंडिया, साउथ इंडिया बँक, स्टँडर्ड चार्टर्ड यांचा त्यात समावेश आहे.

०६. 'भीम'वरून व्यवहार करण्यासाठी पैसे पाठविणारा आणि स्वीकारणारा या दोघांचेही 'यूपीआय'सक्षम बँकेत खाते हवे. वापरणाऱ्याच्या फोनमध्ये मोबाइल बँकिंग सुरू असणे आवश्यक नाही. मात्र वापरणाऱ्याच्या मोबाइल क्रमांकाची नोंद बँकेत असणे गरजेचे

## 'इंटरनेट ऑफ बर्ड्स' तंत्रज्ञान विकसित

०१. बीएनएचएस (बॉम्बे नॅचरल हिस्ट्री सोसायटी) आणि ॲक्सेंचर यांच्या संयुक्त विद्यमाने भारतात आढळणाऱ्या पक्ष्यांची प्रजाती ओळखण्यासाठी 'इंटरनेट ऑफ बर्ड्स' हे नवीन तंत्रज्ञान विकसित करण्यात आले आहे.

०२. पक्षी निरीक्षकांनी कॅमेऱ्यात टिपलेली पक्ष्यांची प्रतिमा या सॉफ्टवेअरमध्ये टाकल्यावर लगेच त्या पक्ष्याची प्रजाती आणि संबंधित माहितीही समोर येते.

०३. पक्षी निरीक्षकांची संख्या दिवसेंदिवस वाढत असली तरीही अनेकांना त्यांनी कॅमेराबद्ध केलेल्या पक्ष्यांची प्रजाती ओळखता येत नाही. मात्र, 'इंटरनेट ऑफ बर्ड्स' या सॉफ्टवेअरच्या माध्यमातून पक्षी निरीक्षकांनी कॅमेराबद्ध केलेली प्रतिमा त्यात टाकल्यावर या सॉफ्टवेअरमध्ये वापरलेल्या तंत्रज्ञानाच्या माध्यमातून लगेच पक्षी प्रजाती कळते.

०४. हे तंत्रज्ञान विकसित करण्यासाठी ॲक्सेंचर कंपनीला बीएनएचएसने पक्ष्यांशी संबंधित बरीच माहिती पुरवली. भारत जैवविविधतेचे 'हॉटस्पॉट' मानला जातो. जगभरातील जैवविविधतेच्या सुमारे १२.५ टक्के जैवविविधता आणि पक्ष्यांच्या १३०० प्रजाती आहेत.

०५. सध्या या सॉफ्टवेअरच्या माध्यमातून ३०० प्रकारच्या पक्षी प्रजाती ओळखण्याची व्यवस्था करण्यात आली आहे. 'इंटरनेट ऑफ बर्ड्स' हे सॉफ्टवेअर कुणीही, कुठेही आणि नि:शुल्क वापरू शकतात.

## क्रीडा मंत्रालयाकडून 'आयओए'चे निलंबन

०१. भ्रष्टाचाराचा आरोप असलेल्या सुरेश कलमाडी आणि अभय सिंग चौताला यांची भारतीय ऑलिम्पिक असोसिएशनच्या (आयओए) आजीवन अध्यक्षपदी निवड केल्याबद्दल क्रीडा मंत्रालयाने त्यांच्यावर निलंबनाची कारवाई केली आहे.

०२. या प्रकरणी क्रीडा मंत्रालयाने 'आयओए'ला 'कारणे दाखवा' नोटीस बजावली होती. या नोटिशीला उत्तर देण्यासाठी क्रीडा मंत्रालयाने 'आयओए'ला शुक्रवापर्यंतची मुदत दिली होती. या मुदतीमध्ये 'आयओए'ने क्रीडा मंत्रालयाला उत्तर पाठवले नसल्याने त्यांच्यावर ही कारवाई करण्यात आली आहे.

०३. 'आयओए'ची २७ डिसेंबरला वार्षिक सर्वसाधारण सभा घेण्यात आली होती. या सभेत कलमाडी आणि चौताला यांची निवड करण्यात आली होती.

०४. सुरेश कलमाडी आणि अभय सिंग चौताला यांना भारतीय ऑलिम्पिक असोसिएशनचे (आयओए) आजीव अध्यक्षपद दिल्याच्या निषेधार्थ शुक्रवारी नरेंद्र बात्रा यांनी सहयोगी उपाध्यक्षपदाचा राजीनामा दिला आहे

## एप्रिलपासून बंगळुरूत सुरू होणार 'आयफोन'चे उत्पादन

०१. जगप्रसिद्ध ॲपल कंपनी भारतात आयफोनचे उत्पादन सुरू करणार आहे. खास भारतीय बाजारपेठ डोळ्यासमोर ठेऊन बंगळुरू येथे आयफोन उत्पादन सुरू करण्याचे नियोजन ॲपलने केले असल्याचे वृत्त टाइम्स ऑफ इंडियाने दिले आहे.

०२. ॲपलसाठी ओईएमचे (ओरिजनल इक्विपमेंट मॅन्यूफक्चर) काम करणारी तैवानची कंपनी विस्ट्रॉनने बंगळुरू मधील पिन्या येथील औद्योगिक वसाहतीत आयफोनचे उत्पादन सुरू होणार आहे. एप्रिल महिन्यात उत्पादन सुरू होण्याची शक्यता आहे.

०३. भारतात उत्पादन सुरू करण्यास ॲपल गंभीर आहे. सध्या ॲपलला आपली उत्पादने भारतात विकण्यासाठी १२.५ टक्के आयात कर द्यावा लागतो. भारतातच याचे उत्पादन सुरू केल्यास कंपनीला हा कर द्यावा लागणार नाही. त्यामुळे ग्राहकांनाही कमी किमतीत आयफोन विकता येईल.

०४. ॲपलची सर्वात मोठी सहयोगी उत्पादक कंपनी फॉक्सकॉनने यापूर्वी महाराष्ट्रात प्रकल्प सुरू करणार असल्याचे जाहीर केले होते. परंतु या प्रकल्पात फक्त ॲपलचे उत्पादन तयार केले जातील.

०५. ॲपलने भारतात उत्पादन सुरू करण्यापूर्वी सवलतींसह लेबलिंग नियमांत सूट देण्याची इच्छा व्यक्त केली आहे. ॲपलच्या उत्पादनावर उत्पादनाशी निगडीत कोणतीही सूचना किंवा माहिती कंपनीला छापायची नाही.

०६. उत्पादनाशी निगडीत सर्व माहिती ही त्या फोन किंवा टॅब्लेटच्या सॉफ्टवेअरमध्ये देण्याची कंपनीची तयारी आहे. केंद्र सरकारने याबाबत अद्याप आपला निर्णय जाहीर केलेला नाही.भारतीय लेबलिंग नियमांतर्गत उत्पादनावर अशा पद्धतीची माहिती देणे सक्तीचे आहे.

०७. कंपनीने भारतात उत्पादन सुरू करण्याचे जाहीर केल्यानंतर त्यांनी सरकारला काही सवलतीही मागितल्या असल्याचे एका अधिकाऱ्याने सांगितले.

०८. डिपार्टमेंट ऑफ इंडस्ट्रियल पॉलिसी आणि प्रमोशनने (डीआयपीपी) ॲपलची ही मागणी नोव्हेंबर महिन्यात महसूल विभाग आणि डिपार्टमेंट ऑफ इलेक्ट्रॉनिक्स आणि इन्फॉर्मेशन टेक्नॉलॉजी (डीईवायटीवाय) यांच्याकडे पाठवला होता.

०९. विशिष्ट डिझाइन हीच ॲपलच्या उत्पादनांची वेगळी ओळख आहे, असे ॲपलने म्हटले आहे. अनेक देशांमध्ये ॲपल उत्पादनावर जी माहिती असते. ती अत्यंत कमी असते. परंतु, भारतासारख्या देशात याबाबत विस्तृतपणे माहिती द्यावी लागते

## राज्यात पहिले सौर शीतगृह होणार अकोल्यात!

०१. भाजीपाला बियाणे साठवणुकीसाठी राज्यातील पहिले आद्रता विरहित सौर शीतगृह (कोल्ड स्टोरेज) अकोल्यात होणार आहे.

०२. ३६० कोटी रुपये खर्च रून बांधण्यात येणाऱ्या महाराष्ट्र राज्य बियाणे महामंडळाच्या (महाबीज) या शीतगृहाला राष्ट्रीय कृषी विकास योजनेंतर्गत ५० टक्के अनुदान उपलब्ध होईल. अकोल्यातील औद्योगिक वसाहतीत १० हजार स्केअर फूट जागेवर हे शीत गोदाम होणार आहे.

०३. महाबीजकडे एक शीतगृह आहे; परंतु त्या शीतगृहाची साठवण क्षमता मर्यादित असल्याने महाबीजने नवीन गोदामाचा प्रस्ताव शासनाकडे पाठविला होता. या प्रस्तावाला मान्यता प्राप्त झाल्याने महाबीजने सौर शीतगृहाच्या कामास सुरुवात केली आहे.

## पाकिस्तानच्या सात संस्थांवर अमेरिकेचे निर्बंध

०१. पाकिस्तानच्या क्षेपणास्त्र कार्यक्रमाशी संबंधित असलेल्या सात पाकिस्तानी संस्थांवर अमेरिकेने व्यापारी निर्बंध लादले आहेत, असे वृत्त 'डॉन'ने दिले.

०२. अमेरिकेच्या व्यापार विभागाच्या अधिकृत अधिसूचनेमध्ये म्हटले आहे की, या सात संस्थांचा समावेश निर्यात प्रशासन नियमन (ईएआर) यादीत करण्यात आला आहे.

०३. अहाद इंटरनॅशनल, एअर वेपन्स कॉम्प्लेक्स, इंजिनियरिंग सोल्युशन्स प्रायव्हेट लिमिटेड, मेरिटाईम टेक्नॉलॉजी कॉम्प्लेक्स नॅशनल इंजिनियरिंग आणि सायंटिफिक कमिशन, न्यू आॅटो इंजिनियरिंग अँड युनिव्हर्सल टूलिंग र्सि व्हसेस. या त्या संस्था आहेत.

## मंगळावर जांभळ्या खडकाचे नमुने सापडले

०१. नासाच्या मार्स क्युरिऑसिटी रोव्हर गाडीने तेथील पर्वतीय भूपृष्ठावरील भागात पसरलेल्या जांभळ्या रंगाच्या खडकांची छायाचित्रे टिपली आहेत, हे जांभळे खडक सगळीकडे विखरून पडलेले आहेत.

०२. या खडकांच्या प्रतिमा क्युरिऑसिटी मार्सवरील मास्ट कॅम कॅमेऱ्याने टिपल्या आहेत. माउंट शार्प या पर्वतीय भागाच्या पायथ्याला या रोव्हरने अलिकडेच मुशाफिरी केली होती, त्या वेळी ही छायाचित्रे घेतली होती. तेथे वरच्या भागात काही थर दिसत असून त्यांचेही संशोधन आगामी काळात होणार आहे.

०३. खडकांच्या रंगछटेत बदल होत असून माउंट शार्पच्या पायथ्याला असलेल्या या खडकांची रचना वेगळी आहे. जांभळ्या रंगाचे खडक या भागात विखुरलले असून त्यात हेमॅटाइट असल्याचे क्युरिऑसिटीवरील केमिकल अँड मिनरॉलॉजी इन्स्ट्रमेंट (चेमिन) या उपकरणाने दाखवून दिले आहे.

०४. या भागात सतत वारे वाहत असतात व त्यामुळे या खडकांवर धूळ साठून राहिलेली नाही अन्यथा या खडकांचा रंग दिसू शकला नसता.

०५. मास्टकॅम या कॅमेऱ्याने खडकांची छायाचित्रे टिपली असून १० नोव्हेंबर म्हणजे मंगळवारी, १५१६ व्या दिवशी ही छायाचित्रे घेतली आहे.

०६. मंगळावरील सूर्यप्रकाश हा धुळीच्या वातावरणाने झाकोळलेला असला, तरी तेथील रंग नमुने पृथ्वीसारखेच आहेत, असे भूगर्भशास्त्रज्ञांचे म्हणणे आहे. काही खडक नारिंगी व जांभळ्या रंगाचे आहेत. पुढच्या बाजूने ते जांभळे तर बाजूने नारिंगी आहेत, त्यामुळे हेमॅटाइटचा एक थर या दरीत तयार झाला आहे.

# रशियाच्या ३५ अधिकाऱ्यांची अमेरिकेतून हकालपट्टी

०१. अमेरिकेतील अध्यक्षीय निवडणुकीत हेरगिरी केल्याच्या प्रकरणात अमेरिकेचे अध्यक्ष बराक ओबामा यांनी रशियाच्या ३५ राजनैतिक अधिकाऱ्यांची हकालपट्टी केली असून, रशियाच्या गुप्तहेर संघटनांच्या मालकीची दोन संकुले बंद केली आहेत.

०२. त्याला प्रत्युत्तर म्हणून अमेरिकेच्याही ३५ अधिकाऱ्यांची रशियातून हकालपट्टी केली जाईल असे रशियाचे परराष्ट्रमंत्री सर्गेई लावरोव्ह यांनी जाहीर केले. मात्र त्यानंतर लगेचच रशियाचे अध्यक्ष व्लादीमीर पुतिन यांनी अशी कोणतीही कारवाई करणार नसल्याचे क्रेमलिनच्या संकेतस्थळावरून स्पष्ट केले.

०३. जीआरयू व एफएसबी या दोन रशियन गुप्तचर संस्था व जीआरयूचे चार अधिकारी तसेच जीआरयूच्या सायबर कारवायांना मदत करणाऱ्या तीन कंपन्या यांच्यावर र्निबध जारी करण्यात येत आहेत असे ओबामा यांनी सांगितले.

०४. निधीचे गैरनियोजन, व्यक्तिगत माहितीचा उलगडा या प्रकरणी दोन रशियन अधिकाऱ्यांवर अर्थमंत्रालयाने कारवाई केली आहे, तर परराष्ट्र खात्याने मेरीलँड व न्यूयॉर्क येथील रशियन आस्थापने बंद केली आहेत. ती रशिया गुप्तचर कारवायांसाठी वापरत असे असा आरोप आहे. अमेरिकेने रशियाच्या एकूण ३५ गुप्तचर अधिकाऱ्यांची हकालपट्टी केली आहे.